**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत समाविष्ट नळ पाणीपुरवठा योजनांकरिता सौर ऊर्जा पध्दतीचा वापर करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र.१३३/पापु-१९

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २७ डिसेंबर, २०१८

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११५/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६
४) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७
५) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.७३/पापु-१९, दिनांक १८ मे, २०१७
६) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.११०/पापु-१९, दिनांक १४ जुलै, २०१७
७) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.१४/पापु-१९ (शिकाना), दिनांक ११ जाने, २०१८
८) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१८/प्र.क्र.७२/पापु-१९, दिनांक २७ मार्च, २०१८
९) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.११०/पापु-१९, दिनांक २७ मार्च, २०१८
१०) मुख्यमंत्री सचिवालय यांची टिप्पणी क्रमांक: मुमंस-२०१८/प्र.क्र.०५/प्रशासकीय कक्ष, दिनांक ११ जुलै, २०१८

**प्रस्तावना:-**

राज्याच्या ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याचा प्रश्न सोडविण्यासाठी विविध कार्यक्रमांतर्गत पाणीपुरवठा योजना राबविण्यात येत आहेत. पाणी पुरवठा योजनांच्या एकूण देखभाल दुरुस्तीच्या खर्चाचा विचार केल्यास सुमारे ४० ते ७० टक्के खर्च हा विद्युत देयकावर असतो. हा खर्च पाणी पट्टीच्या वसुलीतून भागवायचा असतो. स्थानिक स्वराज्य संस्थाकडून आकारण्यात आलेल्या पाणीपट्टीची पुरेशा प्रमाणात वसूली होत नसल्याने विद्युत देयक भरता येत नाही. पर्यायाने महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीकडून अशा योजनांचा विद्युत पुरवठा खंडीत करण्यात येतो. परिणामी योजना बंद पडून त्या कायमस्वरुपी निकामी होण्याची शक्यता असते. यावर उपाय म्हणून सौर ऊर्जा वापरणे हा उत्तम पर्याय ठरु शकतो. तसेच मा.मुख्यमंत्री महोदयांनी छोटे, आर्थिकदृष्ट्या कमी उत्पन्न असलेल्या ग्रामपंचायतीना वीजबिल भरण्यामध्ये अडचणी येत असल्याने त्या गावांमधील मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल योजना सौरऊर्जा पध्दतीचा वापर करुन राबविण्यात यावी, असे निर्देश दिले आहेत. सदर निर्देशाच्या अनुषंगाने मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत समाविष्ट छोटया व आर्थिकदृष्टया कमी उत्पन्न असलेल्या गावांतील नळ पाणीपुरवठा योजनांकरिता सौर ऊर्जा पध्दतीचा वापर करणेबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या १० अश्वशक्ती (HP) क्षमतेपर्यंतच्या नळ पाणीपुरवठा योजनांकरिता सौर ऊर्जेचा वापर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार अंमलबजावणी यंत्रणांनी (जिल्हा परिषद/मजीप्रा) खालीलप्रमाणे कार्यपध्दतीचा अवलंब करुन कार्यवाही करावी.

१) सौर पंप आस्थापित करताना नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांनी विहीत केलेल्या निकषानुसार सावली विरहित पुरेसी जागा (Shadow Free Area) उपलब्ध असल्याची व सदर जागा ग्रामपंचायतीच्या नावे असल्याची खात्री करण्यात यावी.

२) सौर पंप आस्थापित करताना केंद्र शासनाच्या नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय आणि महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या मागदर्शक सूचना व तांत्रिक मोजमापे याचा अवलंब करण्यात यावा.

३) सौर पंप आस्थापित करण्याचे काम खुल्या निविदा प्रक्रियेद्वारे करण्यात यावे. सदर निविदेसाठी येणारी सौर पंपाची किंमत केंद्र शासनाच्या आधारभूत किंमत (Bench Mark Cost) दरपत्रकानुसार ठरविण्यात यावी.

४) सौर पंप (सौर ऊर्जा संच, पंप, पॅनेल व अनुषंगिक साहित्य सामुग्री) उभारणीसाठी किमान ५ वर्षाच्या वार्षिक देखभाल दुरुस्तीची अट निविदेमध्ये नमुद करण्यात यावी.

५) सौर पंप आस्थापित करण्यापुर्वी सदर सौर पंप कार्यक्षम असल्याचा नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, नवी दिल्ली मान्यताप्राप्त प्रयोगशाळेकडून चाचणी अहवाल प्राप्त करुन घेण्यात यावा.

६) सदर पंपासाठी वापरण्यात येणारे सोलर पॅनलची (मोड्युल्स) क्षमता व योग्यता नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांच्या परिमाणानुसार असावी. तसेच सोलर पॅनल भारतीय बनावटीचे असणे आवश्यक आहे. सोलर पॅनलचा हमी कालावधी (वॉरंटी) १० वर्षाचा असावा.

७) ज्याठिकाणी विद्युत पुरवठा उपलब्ध नाही त्याठिकाणी पारेषण विरहित सौर ऊर्जा संच आस्थापित करणे. आवश्यक असल्यास सौर ऊर्जा नेट मिटरींग पध्दतीचा अवलंब महाराष्ट्र विद्युत पारेषण कंपनी व महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या मार्गदर्शक सूचना व परिपत्रकानुसार करण्यात यावा.

८) सौर ऊर्जेवर चालणा-या पंपाच्या पॅनेलच्या सुरक्षिततेस अत्यंत महत्व देण्यात यावे. यासाठी नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांच्या मार्गदर्शक सुचनेतील सुरक्षिततेच्या

निकषांचा वापर करण्यात यावा. तसेच सौर उर्जेच्या पॅनेल भोवती तारेचे/भिंतीचे कंपाऊंड बांधणे अनिवार्य आहे. सौर पॅनेल जमिनीपासून किमान २-३ मीटर उंचीवर उभारले जावेत.

९) सौर ऊर्जा पंप आस्थापित करण्यापुर्वी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणाकडून (महाऊर्जा) तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. तसेच सौर पंपाची उभारणी पुर्ण झाल्यानंतर व पाणीपुरवठा योजना कार्यान्वित झाल्यानंतर त्याची १०० टक्के तांत्रिक तपासणी महाऊर्जा व जिल्हा परिषद/ मजीप्रा यांचेकडून करण्यात यावी.

२. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांर्तत मंजूर नळ पाणीपुरवठा योजनांकरिता सौर ऊर्जा पंपाचा वापर केल्याने योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजूरीप्राप्त किंमतीमध्ये वाढ होत असल्यास, अशा योजनांची अंदाजपत्रके सुधारीत प्रशासकीय मंजूरीसाठी शासनास सादर करण्यात यावीत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२०१७२४५९९४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.12.27 14:20:18 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्य मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
६. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
११. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग (सर्व)
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१३ निवडनस्ती (पापु-१९)